पदोन्नतीच्या निवडसूचीस मान्यता घेणे व निवडसूचीनुसार रिक्त पदांवर पदोन्नतीने नियुक्ती देण्याचा प्रस्ताव एकत्रितरित्या शासनास सादर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही २०१५/व्हीआयपी २०९/प्र.क्र.४११ /कार्यासन १२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख: २४ ऑगस्ट, २०१५

वाचा-

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही -१०७६-१९०१-बारा दिनांक २९ सप्टेंबर १९७६

२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही -२००५/प्र.क्र.५/०५/१२ दिनांक २६ जून,२००६

३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही २०१०/प्रक्र.३४७/१०/१२ दिनांक २४ फेब्रुवारी,२०११

**प्रस्तावना-**

संदर्भाधीन शासन आदेशांमध्ये नमूद प्रचलित कार्यपध्दतीनुसार शासन सेवेतील गट-अ मधील (सुधारित वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेडपे ७६०० व त्यापेक्षा कमी दर्जाच्या ) (असुधारित वेतन श्रेणी रु.१२०००-१६५०० व त्यापेक्षा कमी दर्जाच्या) आणि गट-ब (राजपत्रित) मधील पदांवर पदोन्नतीसाठीच्या निवडसूचीचे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाकडून तपासण्यात येतात. त्याचप्रमाणे गट- अ मधील (सुधारित वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेडपे ७६०० पेक्षा जास्त दर्जाच्या ) पदांवरील पदोन्नतीसाठी आस्थापना मंडळ १ व २ मार्फत निवडसूची तयार करुन देण्यात येते. या संदर्भात असे आढळून आले आहे की, सामान्य प्रशासन विभागाची/ आस्थापना मंडळाची मान्यता मिळाल्यानंतर निवडसूचीस शासनाची मान्यता घेण्यासाठी प्रस्ताव प्रशासकीय विभागांकडून शासनास सादर केले जातात. निवडसूचीस शासन मान्यता मिळाल्यानंतर त्याअनुषंगाने रिक्त पदांवर पदोन्नतीने नियुक्ती देण्याचा प्रस्ताव पुन्हा स्वतंत्रपणे शासनास सादर केले जातात. अशा प्रकारे पदोन्नतीचे व पदस्थापनेचे प्रस्ताव दोनदा शासनास सादर होत असल्याने त्यात कालापव्यय होतो. प्रशासनात गतीमानता येण्यासाठी निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाची/ आस्थापना मंडळाची मान्यता

मिळाल्यानंतर पदोन्नतीच्या निवडसूचीस शासनाची मान्यता घेणे व त्यानुसार रिक्त पदावर पदोन्नतीने नियुक्ती देण्याचा प्रस्ताव स्वतंत्ररित्या शासनास सादर न करता **एकत्रितरित्या** सादर करण्याच्या सूचना सर्व प्रशासकीय विभागांच्या सचिवांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

१. पदोन्नतीच्या निवडसूचीस मान्यता घेणे व निवडसूचीनुसार रिक्त पदांवर पदोन्नतीने नियुक्ती करण्याबाबत असे आदेश देण्यात येत आहे की सर्व संबंधित प्रशासकीय विभागांच्या सचिवांनी यापुढे पदोन्नतीच्या निवडसूचीस प्रकरणपरत्वे सामान्य प्रशासन विभागाची/ आस्थापना मंडळाची मान्यता मिळाल्यानंतर निवडसूचीस मान्यता घेणे व त्या निवडसूचीनुसार रिक्त पदांवर पदोन्नतीने नियुक्ती देण्याचा प्रस्ताव एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. त्याचप्रमाणे, सचिव व सचिव समकक्ष व त्यावरील पदांकरिता (सार्वजनिक बांधकाम, जलसंपदा, विधी व न्याय इ.विभागातील) तयार झालेल्या निवडसूचीचे व त्या निवडसूचीनुसार रिक्त पदांवर नियुक्ती देण्याचे प्रस्ताव अपर मुख्य सचिव (सेवा) व मुख्य सचिव यांच्या मार्फत एकत्रितरित्या शासनास सादर करण्यात यावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२४१६४२४९३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.08.24 16:52:15 +05'30'

डॉ. भगवान सहाय

अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग,
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३. *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
१४. *प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मंबई,
१५. *सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१७. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
२०. *सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
२१. *प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई ४०० ००१,
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (२ प्रती प्रसिध्दीकरिता),
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२५. सर्व विभागीय आयुक्त,
२६. सर्व जिल्हाधिकारी,
२७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२९. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३०. सामान्य प्रशासन विभाग/का. ३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरिता),
३१. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
३२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
३३. निवड नस्ती.